**कांबळगांव, जि.पालघर व मुंढेगाव, जि. नाशिक येथे मध्यवर्ती स्वयंपाकगृह (Centralized Kitchen) साठी प्रति विद्यार्थी देण्यात येणा-या रकमेत वाढ करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः शाआशा-२०१५/प्र.क्र.१००/का.१३

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०१ एप्रिल, २०१७

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय सम क्रमांक, दि.२९ जुलै, २०१५.

**प्रस्तावना -**

शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना पौष्टीक व चांगला नाष्टा, दोन वेळचे जेवण व अल्पोपहार पुरविण्यासाठी कांबळगांव, जि. पालघर व मुंढेगाव, जि. नाशिक येथे टाटा ट्रस्ट व अक्षय पात्रा फाउंडेशनच्या सहकार्याने मध्यवर्ती स्वयंपाकगृह(Centralized Kitchen) सुरू करण्यास संदर्भीय शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सद्यस्थितीत कांबळगाव जि.पालघर येथील मध्यवर्ती स्वयंपाकगृहातून तसेच मुंढेगाव जि.नाशिक येथील मध्यवर्ती स्वयंपाकगृहातून ६० कि.मि. परिसरात असलेल्या आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांना दररोज एक वेळचा नाश्ता, दोनवेळचे जेवण, तसेच एक वेळ अल्पोपहार पुरविण्यात येत आहे. त्या बाबतचा तपशील खालील तक्त्यात दर्शविला आहे.

| अ.क्र. | मध्यवर्ती स्वंयपाकगृह ठिकाण | कार्य क्षेत्रातील शाळांची संख्या | वसतीगृहात राहणारे विद्यार्थी (hosteller) | वसतीगृहात न राहणारे विद्यार्थी(Day-Scholars) | एकुण विद्यार्थी |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | कांबळगाव | २५ | ७२६७ | ४६८९ | ११९५६ |
| २ | मुंढेगाव | १५ | ३७९९ | ८६८ | ४६६७ |

२. वसतीगृहात रहाणा-या(hostellers) विध्यार्थ्यांना एक वेळचा नाश्ता ,दोन वेळचे जेवण,तसेच एक वेळ अल्पोपहार पुरविण्यात येतो तर वसतीगृहात न रहाणा-या(Day-scholars) विध्यार्थ्यांना एक वेळचा नाश्ता व एक वेळचे जेवण पुरविण्यात येते.

३. उपरोक्त संदर्भीय शासन निर्णयातील परिच्छेद ५ (२) अन्वये विद्यार्थ्यांच्या जेवणासाठी प्रतिविद्यार्थी/प्रतिमहिना रुपये १९९७/- एवढी रक्कम विभागा मार्फत देण्याची तरतुद करण्यात आली आहे परंतु यासंदर्भात बैठकीमध्ये वसतीगृहात रहाणा-या विध्यार्थ्यांवर रु.१९९७/- व वसतीगृहात न रहाणारे विध्यार्थ्यांवर रु.१०६४/- इतकी रक्कम निश्चित करण्यात आली आहे. रक्कम निश्चित करतांना केवळ अन्नधान्य कच्चामाल व इंधन इ. खर्चाचा विचार करण्यात आला होता. परंतु सदर रकमेमध्ये वाहतुक खर्च, बाहेरील आचारी, वार्षीक देखभाल खर्च (बॉइलर,पाणी यंत्र,चपाती मशिन,एसटीपी आणि पेस्ट कंट्रोल ), दुरुस्ती ई. किंमतीचा समावेश करण्यात आला नसल्यामुळे सदरचा खर्च प्राप्त निधीतून करण्यात येत होता. तसेच टाटा ट्रस्ट यांना प्रती विद्यार्थी देण्यात येणारी रक्कम त्यांच्या खात्यावर जमा करण्यापुर्वी कोषागारा मार्फत सदर रक्कमेवर TDS (Tax Deducted at Source ) वसुल केला जात आहे. त्यामुळे मध्यवर्ती स्वयंपाक गृह चालविण्यासाठी निश्चित करण्यात आलेल्या मुळ रकमेपेक्षा प्रत्यक्षात कमी रक्कम अदा करण्यात येते. त्यामुळे उक्त बाबी आणि अन्नधान्य, किराणा, भाजीपाला व इंधन यांची भाववाढ विचारात घेऊन यापुर्वी प्रतीविद्यार्थी निश्चित केलेल्या रक्कमे मध्ये वाढ करण्याची आवश्यकता आहे.

४. संदर्भीय शासन निर्णयातील परिच्छेद ३ मध्ये नमुद सुकाणू समितीस वेळोवेळी आढावा घेऊन प्रती विद्यार्थी निच्छित करावयाच्या रक्कमे संदर्भात निर्णय घेण्याचे अधिकार आहेत. सदर आधिकारानुसार दि.१३ जानेवारी २०१७ रोजी पार पडलेल्या सुकाणू समितीच्या बैठकी मध्ये प्रती विद्यार्थी देण्यात येणा-या रुपये १९९७/- या रक्कमे मध्ये वाढ करण्या बाबत टाटा ट्रस्ट यांनी विनंती केल्या प्रमाणे चर्चा होऊन सदर रकमेमध्ये वाढ करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.त्या अनुषंगाने संदर्भीत शासन निर्णयातील परिच्छेद ५(२) मध्ये नमुद रक्केमेत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

संदर्भाधिन शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या रुपये १९९७/-या प्रति विद्यार्थि प्रती महा देण्यात येणा-या रक्कमे मध्ये वहातूक खर्च,बाहेरील आचारी,एएमसी (बॉइलर, पाणी, यंत्र, चपाती मशिन, एसटीपी आणि पेस्टकंट्रोल ), दुरुस्ति ई. खर्चाचा समावेश करुन त्याअनुषंगाने १० टक्के वाढ करणे अधिक TDS ( Tax Deducted at Source ) वजावटी ची अगाऊ भरपाई म्हणुन २ टक्के वाढ करणे अशी एकुण १२ टक्के वाढ दि. १.२.२०१७ पासून करुन वसतीगृहात रहाणा-या(hostellers) विद्यार्थ्यां साठी सदर रक्कम रुपये २२३७/- प्रती विद्यार्थी प्रती महा इतकी वाढविण्यास, तसेच वसतीगृहात न राहणारे(Day-scholars) विध्यार्थ्यां साठी सदर रक्कम रुपये ११९२/- प्रती विद्यार्थी प्रती महा इतकी वाढविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(२) सदर योजने साठी कांबळगाव येथे "अन्नपुर्णा मध्यवर्ती स्वयंपाकगृह" व मुंढेगाव येथे "अक्षयपात्र मध्यवर्ती स्वयंपाकगृह" या नावाने आदिवासी विकास विभाग व टाटा ट्रस्ट यांच्या नावाने संयुक्त खाते उघडले आहे. शासना कडून मध्यवर्ती स्वयंपाकगृहासाठी देण्यात येणारा सर्व निधी याच खात्यात जमा करण्यात यावा. सदर खाते संबंधीत मध्यवर्ती स्वयंपाकगृहासाठी विभागाने नियुक्त केलेले वर्ग दोन चे अधिकारी व टाटा ट्रस्टचे प्रतिनिधी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने वापरण्यात यावे.

(३) भविष्यात इतर आश्रम शाळांचा या योजनेत समावेश झाल्यास अथवा विद्यार्थी संख्येत वाढ झाल्यास सदर दर लागू राहतील. सदर मंजुर दरा प्रमाणे रक्कम अदा करण्यात यावी.

(४) सदर खर्च आश्रम शाळा समुह योजना लेखाशीर्ष २२२५,डी-७३४ ,१९ आहारखर्च मधुन भागविण्यात यावा.

(५) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०११७३९४५४७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.04.01 17:41:23 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव**

**प्रत,**

१.मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२.मा. मंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव.
३.मा. राज्यमंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव.
४. सचिव ( आदिवासी विकास विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५.आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६.अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक
७.प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक/डहाणू/जव्हार.
८.महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई.
९.महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नाशिक/पालघर.

११.जिल्हा कोषागार अधिकारी नाशिक/पालघर.

१२.सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.टाटा ट्रस्ट,मुंबई यांचे प्रतिनिधी .

१४.अक्षय पात्रा फ़ाऊंडेशन यांचे प्रतिनिधी.

१५.निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.